**महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर नियामक मंडळावर विशेष निमंत्रित सदस्य म्हणून नामनिर्देशित सदस्यांची नियुक्ती रद्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. बांबूसा-२०१५/प्र.क्र.१३९/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : १५ जुलै, २०२०

वाचा :-

१. महसूल व वन विभाग, शासन पत्र क्र.बांबूसा-२०१५/प्र.क्र.१३९/फ-९, दिनांक ०६.०८.२०१६
२. महसूल व वन विभाग, शासन पत्र क्र.बांबूसा-२०१५/प्र.क्र.१३९/फ-९, दिनांक ०२.०२.२०१७
३. महसूल व वन विभाग, शासन पत्र क्र.बांबूसा-२०१५/प्र.क्र.१३९/फ-९, दिनांक ०९.०८.२०१९
४. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.०४/ ई-४२०६८०२/का-२९-अ, दिनांक १६ जानेवारी, २०२०

प्रस्तावना:-

बांबू क्षेत्राचा सर्वांगीण विकास होण्याच्या दृष्टीने त्यावर विशेष लक्ष देण्याकरीता “महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची" स्थापना संदर्भाधिन दिनांक ०६.०८.२०१६ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.२ दिनांक ०२.०२.२०१७ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र बांबू विकास मंडळाचे उपविधीस (Bye-laws) शासन मान्यता देण्यात आली आहे. सदर उपविधीच्या अनुच्छेद ५ मध्ये मा.मंत्री (वने) यांच्या अध्यक्षतेखालील नियामक मंडळाची रचना असून यामध्ये नियामक मंडळाचे कामकाज चालवण्यासाठी विशेष निमंत्रित सदस्य नामनिर्देशन करण्याची तरतूद आहे.

त्यानुसार संदर्भाधिन क्र.३ दिनांक ०९.०८.२०१९ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर च्या नियामक मंडळावर विशेष निमंत्रित सदस्य म्हणून ४ नामनिर्देशित अशासकीय सदस्यांच्या नियुक्तीस मान्यता देण्यात आली आहे.

सामान्य प्रशासन विभाग संदर्भ क्र.४ दिनांक १६.०१.२०२० च्या पत्रान्वये प्रशासकीय विभागांतर्गत विविध कायदा/अधिनियम/नियमाद्वारे स्थापित केलेले शासकीय/अशासकीय मंडळे व समित्यांवर नियुक्त/ केलेल्या सदस्यांच्या पूर्व नियुक्त्या रद्द करुन, नव्याने मंडळे व समित्या पुर्नगठीत करण्याचे निर्देश आहेत. त्यामुळे महाराष्ट्र बांबू विकास मंडळाच्या विशेष निमंत्रित नामनिर्देशित अशासकीय सदस्यांची नियुक्ती रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर च्या नियामक मंडळावर संदर्भ क्र.३ दिनांक ०९.०८.२०१९ च्या शासन निर्णयान्वये "विशेष निमंत्रित सदस्य" म्हणून नामनिर्देशित केलेल्या एकूण ४ सदस्यांच्या नियुक्त्या रद्द करण्यात येत आहे.

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर यांनी उपरोक्त शासन निर्णय संबंधित विशेष निमंत्रित सदस्य म्हणून नामनिर्देशित केलेल्या सदस्यांच्या निदर्शनास आणण्याची कार्यवाही करावी,

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७१५१५३८४५७३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a6a471816b9dbfd727f2e5ec4825f4678c8393d846acd1c16b8936c8b3a519c6, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUJAY DEORAO DODAL
Date: 2020.07.15 15:49:22 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति:- माहिती व उचित कार्यवाहीसाठी**

१. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
३. प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (आदिवासी विकास विभाग) मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (ग्राम विकास) मंत्रालय, मुंबई
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर
९. श्री.पाशा पटेल, अध्यक्ष (राज्यमंत्री दर्जा), राज्य कृषि मूल्य आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. श्री.हरिष मारोती आप्पा पिंपळे, आमदार, मूर्तिजापूर, जि.अकोला.
११. श्री.विलास मुरलीधर सुरवसे, अध्यक्ष, बुरुड समाज व्यापारी असोसिएशन, मोडनिंब, ता.माढा, जि.सोलापूर
१२. श्री.बाळासाहेब सपकाळ, सपकाळ ट्रेंडर्स, पुणे सोलापूर रोड, लोणी स्टेशन, जिल्हा पुणे
१३. सह सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)